नाशिक जिल्ह्यातील देवळा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१५५/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ०४ डिसेंबर, २०१८**

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/ता.देवळा/६१५४/२०१८ दि. २८/०९/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील देवळा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्ते देवळा तालुक्यातील मोठ्या भागातील शेतमाल बाजारपेठेपर्यंत पोहचविण्या करीता उपयोगी आहेत. या रस्त्यावरील गावांसाठी दळणवळणाच्या दृष्टीने महत्त्वाचे असून राज्यमार्ग व राष्ट्रीय महामार्ग यांना जोडणारे महत्त्वाचे रस्ते आहेत. सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग -५४ पासून लोहणेर - खालप - मेशी - डोंगरगांव - नांदगांव ते प्रमुख जिल्हा मार्ग -९९ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग ७५ | (०/०० ते ३०/५००) ३०.५०० कि.मी. | ३०.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२८ |
| २. | देवळा (राज्यमार्ग-०७) पासून वाखारी - चिंचवे - कुंभार्डे ते राज्यमार्ग-२० ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २०५ | (०/०० ते १६/२५०) १६.२५० कि.मी. | २२.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२९ |
| | | इतर जिल्हा मार्ग २०४ | (५/८०० ते ११/५५०) ५.७५० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३. | प्रमुख जिल्हा मार्ग-५४ निंबोळा - महालपाटणे रस्ता - खारीपाडा - फुलेनगर ते उमराणे राज्यमार्ग-२०ला मिळणारा रस्ता. | ग्रामीण मार्ग ४३ | (०/०० ते ३/५००) ३.५०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१३० |
| | | ग्रामीण मार्ग २७ | (०/०० ते ३/५००) ३.५०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग ७६ | (०/०० ते ३/००) ३.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **६२.५०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नाशिक जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **६२.५०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३१६४.३१० + ६२.५००) म्हणजेच **३२२६.८१० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **५२.५०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२८७४.२८० - ५२.५००) म्हणजेच **२८२१.७८० कि.मी.** इतकी तसेच **ग्रामीण मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१०.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१०६७९.३५० - १०.००) म्हणजेच **१०६६९.३५० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०४१५२८२१३५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.12.04 15:31:53 +05'30'

**(स्वरूप रायपुरे)**
उपअभियंता तथा कार्यासन अधिकारी,
महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी,नाशिक.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.